GR-200408121510006001-0100

मंत्री / राज्यमंत्री आस्थापनेसाठी कर्मचारी आकृतीबंध...

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांकः-एमआयएन-२००३/प्र.क्र.१७२/०३/२१,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांकः- १२.४.२००४

संदर्भ : १) सा.प्र.वि., शासन परिपत्रक, एमआयएन-१०८६/५४/२१, दि.१५.३.१९८६
२) सा.प्र.वि., शा.नि.क्र.एमआयएन-२००३/प्र.क्र.२२/२००३/२१, दि.१४.२.२००३.

**शासन निर्णय :**

शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : एमआयएन-१०८६/५४/२१, दिनांक १५.३.१९८६ चे अधिक्रमण करुन मंत्री / राज्यमंत्री आस्थापनेवर खाली दर्शविल्यानुसार कर्मचारी आकृतीबंध अनुज्ञेय आहे, असा शासनाने निर्णय घेतलेला आहे.

| मंत्री कार्यालय | | | राज्यमंत्री कार्यालय | | |
|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | पदनाम | एकूण पदे | अ.क्र. | पदनाम | एकूण पदे |
| १ | खाजगी सचिव | १ | १ | खाजगी सचिव | १ |
| २ | स्वीय सहायक | ३ | १ | स्वीय सहायक | ३ |
| ३ | लघुलेखक | २ | ३ | लघुलेखक | २ |
| ४ | लिपिक/टंकलेखक | २ | ४ | लिपिक/टंकलेखक | १ |
| ५ | वाहन चालक | १ | ५ | वाहन चालक | १ |
| ६ | चोपदार | १ | ६ | चोपदार | १ |
| ७ | शिपाई /संदेशवाहक | ५ | ७ | शिपाई / संदेशवाहक | ४ |
| | एकूण | १५ | | एकूण | १३ |

२. सदर पदावर नियुक्ती / प्रतिनियुक्तीसाठी कोणत्या संवर्गातील शासकीय / निमशासकीय कार्यालये / स्वायत्त संस्था, महामंडळे यातील अधिकारी / कर्मचारी पात्र असू शकतील. याबाबतचा तपशील परिशिष्ट 'अ' व 'ब' मध्ये दर्शविण्यात आलेला आहे.

३. मंत्री / राज्यमंत्री आस्थापनेवर नियुक्त करण्यात येणा-या अधिकारी / कर्मचा-यांना (बाहेरील उमेदवार वगळून ) मंत्री आस्थापनेवर असेपर्यंत त्यांच्या वेतनश्रेणीतील अनुज्ञेय वेतन + इतर सर्व अनुज्ञेय भत्ते ( विशेष कार्यभत्ता वाहनचालक व चतुर्थश्रेणी कर्मचा-यांसाठी ) देय होतील. तसेच शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : पीओवाय-१०९९/प्र.क्र.३/९९/का.२१, दिनांक ८.१२.१९९९ अन्वये त्यांना विशेष वेतन अनुज्ञेय राहील.

४. मंत्री आस्थापनेवरील सर्व वाहनचालकांना शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : पीएवाय -१०९०/प्र.क्र.२८८/९०/२१, दिनांक २४.६.१९९२ अन्वये दरमहा रु.४२५/- विशेष कार्यभत्ता देय राहील. तसेच सर्व चतुर्थश्रेणी कर्मचा-यांना शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : पीएवाय

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : ११०८/०३/व्यय-४, दि. २२/१२/२००३ नुसार त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( आर.के.गायकवाड )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) सचिव, मुख्यमंत्री सचिवालय,मंत्रालय, मुंबई,
२) सचिव, उपमुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई,
३) खाजगी सचिव, सर्व मंत्री / राज्यमंत्री कार्यालये,
४) सर्व मंत्रालयीन विभाग,
५) निवड फाईल.

शासन निर्णय, सा.प्र.वि., क्र.एमआयएन-२००३/प्र.क्र.१७२/०३/२१, दि. [illegible] २००४ चे

परिशिष्ट - "अ"

मंत्री आस्थापनेवरील नियुक्ती / प्रतिनियुक्तीसाठी कोणत्या संवर्गातील शासकीय / निमशासकीय अधिकारी / कर्मचारी पात्र असतील याचा तपशील दर्शविणारे विवरणपत्र.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | संवर्ग ज्यातून प्रतिनियुक्ती करण्यात यावी. |
|---|---|---|---|
| १ | खाजगी सचिव | रु.८०००-१३५००<br>रु.१००००-१५२०० | अवर सचिव / उप जिल्हाधिकारी किंवा समतुल्य वर्गातील शासकीय/ निमशासकीय अधिकारी / महामंडळे, स्वायत्त संस्था यातील अधिकारी |
| २ | स्वीय सहायक | रु.७४५०-११५००<br>रु.६५००-१०५००<br>रु.५५००-९०००<br>रु.५०००-८००० | कक्ष अधिकारी / सहायक अगर समतुल्य वेतनश्रेणीतील शासकीय / निमशासकीय अधिकारी, महामंडळे / स्वायत्त संस्था मधील कर्मचारी प्रतिनियुक्तीने नियुक्तीस पात्र ठरतील. तथापि लघुलेखक (निवडश्रेणी/उच्चश्रेणी/ निम्नश्रेणी)हे पदधारक स्वीय सहायक पदावरील नियुक्तीसाठी पात्र ठरणार नाहीत. |
| ३ | लघुलेखक | रु.७४५०-११५००<br>रु.६५००-१०५००<br>रु.५५००-९०००<br>रु.४०००-६००० | लघुलेखक ( निवडश्रेणी /उच्चश्रेणी /निम्नश्रेणी ) / लघुटंकलेखक शासकीय / निमशासकीय सेवेतील अथवा महामंडळे / स्वायत्त संस्था येथील प्रतिनियुक्तीने |
| ४ | लिपिक-टंकलेखक | रु.३०५०-४५९०<br>रु.३२००-४९०० | लिपिक, लिपिक-टंकलेखक } शासकीय /<br>टंकलेखक } निमशासकीय |
| ५ | वाहनचालक | रु.३०५०-४५९० | वाहनचालक } शासन सेवेतील महामंडळे<br>} स्वायत्त संस्था येथील<br>} प्रतिनियुक्तीने. |
| ६ | चोपदार | रु.३०५०-४५९० | फक्त मंत्रालयातील विभागातील चतुर्थश्रेणीतील कर्मचारी प्रतिनियुक्तीने. |
| ७ | शिपाई /<br>संदेशवाहक | रु.२६१०-४०००<br>रु.२५५०-३२०० | शिपाई / हमाल |

मंत्री / राज्यमंत्री आस्थापनेवरील अनुक्रमे ५ व ४ शिपायांपैकी एकाच पदावर चतुर्थश्रेणीतील परंतु नाईक, हवालदार, रोनिओ चालक, उद्वाहक इत्यादी उच्चश्रेणीतील कर्मचारी नेमला गेल्यास अशा कर्मचा-यांच्या बाबतीत वेतनश्रेणीतील वेतन अधिक विशेष वेतन हे त्या पदाच्या वेतनश्रेणीच्या कमाल मर्यादेपेक्षा जास्त होता कामा नये.

शासन निर्णय, सा.प्र.वि. क्र.एमआयएन-२००३/प्र.क्र.१७२/०३/२१, दिनांक [illegible] चे

## परिशिष्ट - " ब "

## बाहेरील उमेदवार नियुक्ती कार्यपध्दती

सध्याचे प्रचलित नियुक्ती नियम पध्दतीनुसार मंत्री महोदयांना स्वीय सहायक व शिपाई / संदेशवाहक पदांपैकी प्रत्येकी एकच पद व वाहनचालक बाहेरील उमेदवार म्हणून नेमण्याची मुभा आहे. मात्र स्वीय सहायक पदावर नियुक्तीसाठी सुचविलेल्या उमेदवारांची शैक्षणिक पात्रता कमीत कमी एस.एस.सी उत्तीर्ण व त्याची वयोमर्यादा २५ वर्षापेक्षा कमी व ५८ वर्षापेक्षा जास्त असता कामा नये.

२. वाहनचालक व शिपाई पदावरील बाहेरील उमेदवार नेमताना सर्वसाधारण प्रवर्गातील उमेदवारांसाठी कमाल वयोमर्यादा ३० वर्षे आणि मागासवर्गीयांसाठी ३५ वर्षापेक्षा वयोमर्यादा जास्त असु नये. वाहनचालक व शिपाई पदावरील बाहेरील उमेदवाराच्या बाबतीत शैक्षणिक अर्हता किमान ४ थी इयत्ता उत्तीर्ण असावी.

३. सर्व बाहेरील उमेदवारांची नियुक्ती संबंधित मंत्री महोदयांच्या / मंत्रीमंडळाच्या कालावधीपुरतीच मर्यादित व कंत्राटी पध्दतीची असेल. त्याची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता व कोणतेही कारण न दाखविता कधीही संपुष्टात आणण्याचा अधिकार शासनास राहील. बाहेरील उमेदवारांना शासकीय / निमशासकीय सेवेत सामावून घेण्याचा हक्क राहणार नाही, याची कृपया नोंद घ्यावी.

४. निमशासकीय संस्था, महामंडळे, स्वायत्त संस्था इत्यादी मधील मंत्री आस्थापनेवर नियुक्त झालेले उमेदवार बाहेरील उमेदवार म्हणून समजले जाणार नाहीत. त्यांना प्रतिनियुक्तीवर समजून त्यांच्या प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती संबंधित प्रशासकीय विभागाकडून निश्चित केल्या जातील.

५. बाहेरील उमेदवारातून नियुक्त करण्यात येणा-या स्वीय सहाय्यक, वाहनचालक, शिपाई / संदेशवाहक यांना नियुक्तीचे कालावधीत शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : एमआयएन - १०९९/प्र.क्र.१०/९९/२१, दिनांक ३० ऑगस्ट, १९९९ मधील तरतुदीनुसार खालीलप्रमाणे वेतन व इतर भत्ते तसेच विशेष कार्य भत्ते अनुज्ञेय होतील.

| | |
|---|---|
| १) स्वीय सहाय्यक | रु.५५००-१७५-९००० + महागाई भत्ता + घरभाडे भत्ता + वाहतूक भत्ता + स्थानिक पूरक भत्ता |
| २) वाहनचालक | रु.३०५०-७५-३९५०-८०-४५९० + महागाई भत्ता + घरभाडे भत्ता + वाहतूक भत्ता + स्थानिक पूरक भत्ता + रु.४२५/- द.म. विशेष कार्य भत्ता |
| ३) शिपाई | रु.२५५०-५५-२६६०-६०-३२०० + महागाई भत्ता + घरभाडे भत्ता + वाहतूक भत्ता + स्थानिक पूरक भत्ता + द.म. रु.१५०/- विशेष कार्य भत्ता |

-X-X-X-X-